सन २०१४-१५ करिता हवामानावर आधारीत फळपिक विमा योजनेसाठी पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध झालेला निधीस वित्तीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांकः-विमायो-१०१५/प्र.क्र.१३/१४-अे**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,

दिनांकः- १९ जानेवारी, २०१५

वाचा:-

१) शासन निर्णय कृषी व पदुम विभाग क्र: विमायो-१०१५/प्र.क्र.१६७/१४-अे, दि. ५.१.२०१४

२) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र: विमायो-१०१४/प्र.क्र.८२/१४-अे, दि. ०६.०६.२०१४

३) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र: विमायो-१०१४/प्र.क्र.१६९/१४-अे, दि. २५.११.२०१४

४) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र: कृआ/फलो-१/हआफपिवियोक्लेम/३१३४/२०१४ दि.०८.१२.२०१४

५) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र: विमायो-१०१४/प्र.क्र.१९७/१४-अे, दि.३१.१२.२०१४

६) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र: पुनर्वि-२०१४/(प्र.क्र.२०४/१४)/२अे, दि.०८.०१.२०१५

प्रस्तावना:-

राज्यात संत्रा, मोसंबी, द्राक्ष, केळी, डाळींब, पेरू, आंबा व काजू या फळपिकांसाठी मृग बहार, आंबिया बहार व गारपीट (Add-on / Index plus) साठी सन २०१४-१५ मध्ये हवामानावर आधारित फळपिक विमा योजना राज्यात प्रायोगिक तत्वावर राबविण्यासाठीचा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. सदर योजनेंतर्गत विमा हप्ता अनुदानातील राज्य शासनाच्या हिश्श्याच्या रु. २२,८८,६९,७६६/- इतक्या रक्कमेची मागणी संचालक ( फलोत्पादन ) यांच्या संदर्भ क्रमांक १ च्या पत्रान्वये केली आहे. सन २०१४-१५ या आर्थिक वर्षामध्ये हवामानावर आधारीत फळपिक विमा योजनेस एकूण रु. ७००.०० लक्ष इतकी रक्कम अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. त्यामुळे सन २०१४-१५ करिता राज्य शासनाचा संपूर्ण हिस्सा अदा करण्यासाठी अजून रू. १५,८८,६९,७६६/- इतक्या निधीची आवश्यकता आहे.

२. हवामानावर आधारीत फळपिक विमा योजनेतंर्गत सन २०१४-१५ च्या एकूण अर्थसंकल्पिय तरतूदीअंतर्गत विमा योजनेत भाग घेणा-या खालील तक्यात नमूद विमा कंपनीस राज्य हिस्सा अदा करावयाची आहे.

| अ.क्र. | वर्ष | विमा कंपनीचे नाव | राज्य शासनाच्या हिश्श्याची रक्कम रुपये | | एकूण एकंदरीत रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| | | | मृग बहार | आंबिया बहार | |
| १ | २०१३-१४ | एच.डी.एफ.सी.अर्गा जनरल इन्शुरन्स विमा कंपनी | --- | ५,७०,७१४ | ५,७०,७१४ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २ | २०१४-१५ | एच.डी.एफ.सी.अर्गा जनरल इन्शुरन्स विमा कंपनी | १,०४,६२,१२५ | २,९८,१३,२९६.९ | ४,०२,७५,४२१.९ |
| ३ | २०१४-१५ | इफको टोकियो जनरल इन्शुरन्स कंपनी | ३६,३९६ | ३४,०५,१९५ | ३४,४१,५९१ |
| ४ | २०१४-१५ | टाटा. ए.आय.जी. जनरल इन्शुरन्स कंपनी | ---- | १७,५१,१६,८८२.५० | १७,५१,१६,८८२.५० |
| ५ | २०१४-१५ | रिलायन्स जनरल इन्शुरन्स कंपनी | ----- | ९४,६५,१५७ | ९४,६५,१५७ |
| | एकूण | | १,०४,९८,५२१ | २१,८३,७१,२४५.४० | २२,८८,६९,७६६.०९ |

३. वरील तक्त्यात नमूद संबंधित विमा कंपन्यांना अदा करावयाची राज्य हिश्श्याची एकूण रक्कम रु. २२,८८,६९,७६६.०९ मधून रु. १,१४,४१,३३७/- एवढी रक्कम संदर्भीय क्र. ६ च्या शासन निर्णयान्वये संबंधित विमा कंपन्यांना अदा करण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने उर्वरित संदर्भ क्र. ६ च्या शासन निर्णयान्वये रु. २१,७४,२८,४२९.०९ राज्य हिश्श्यापैकी पुर्नविनियोजनाने उपलब्ध झालेली रु. ४,०२,४९,८४० /- इतकी रक्कम परिच्छेद २ मध्ये नमूद केलेल्या विमा कंपन्यांना अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

सन २०१४-१५ अंतर्गत प्रायोगिक तत्वावरील हवामानावर आधारीत फळपिक विमा योजना राज्य शासनाच्या हिश्याची रक्कम रु. ४,०२,४९,८४० /- या योजनेत भाग घेणा-या परिच्छेद क्रमांक २ येथील विमा कंपन्यांना अदा करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. प्रस्तुतचा खर्च खालील लेखाशिर्षातील सन २०१४-१५ करिता मंजूर करण्यात आलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा:-

"मागणी क्रमांक डी-३, २४०१-पीक संवर्धन,
११०, पिक विमा,
(००) (०७) हवामान आधारित फळपिक विमा योजना
(२४०१ ९४०२), ३३ अर्थसहाय्य.

३. सदर प्रयोजनार्थ आयुक्त, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सहाय्यक संचालक, लेखा अधिकारी(१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे यांनी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीव्दारे उपलब्ध झालेली रक्कम कोषागारातून आहरीत करुन सदर रक्कम उपरोक्त परिच्छेद १ मध्ये नमुद केलेल्या सहभागी विमा कंपनीस दर्शविल्याप्रमाणे बँकेच्या खाती संवितरीत करावी.

४. सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधी तात्काळ उपाययोजना होण्याच्या हेतूनेच कोषागारातून आहरीत करावा आणि सर्व अंमलबजावणी यंत्रणांनी त्यांना प्राप्त होणा-या

निधीचा तात्काळ विनियोग करावा. तसेच अंमलबजावणी यंत्रणांनी सदर निधी उपयोजनाविना बँक खात्यामध्ये जमा करुन ठेवू नये.

५. प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक - ३५९/१४३१ दि. २२.१२.२०१४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक वि.वि./शिकाना-५५२/अर्थ-१३ दि.०६.०१.२०१५ व क्रमांक ३९०/१४ व्यय-१ दिनांक ०६.०१.२०१५ अन्वये त्यांनी दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२०११५०५९१४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Maroti K Kendre

Digitally signed by Maroti K Kendre
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Maroti K Kendre
Date: 2015.01.20 12:18:46 +05'30'

**( मा. के. केन्द्रे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. सहाय्यक संचालक, (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरीक्षा), मुंबई
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरीक्षा), नागपूर
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
७. जिल्हाकोषागार अधिकारी, पुणे
८. अपर मुख्य सचिव (कृषि), यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. उपसचिव (फलोत्पादन), यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०.अवर सचिव, कार्यासन ११ अ, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
११.उपसचिव (२अे), यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२.कक्ष अधिकारी (२अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३.कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई-३२
१४.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग ( का. १४३१), मंत्रालय, मुंबई-३२
१५.निवड नस्ती (कार्यासन १४अे),